हातमाग उद्योगाच्या विकासासंदर्भातील जाहिरात व प्रसिध्दी योजनेअंतर्गत हातमाग प्रदर्शनाकरीता द्याववयाच्या अर्थसहाय्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हातमाग-२०२३/प्र.क्र.१०१/टेक्स-३**
नविन प्रशासन भवन, १४ वा मजला
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ मार्च, २०२४.

**वाचा :**

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.हातमाग-२०११/प्र.क्र.२४७/टेक्स-३, दिनांक २१.०९.२०११.

२) केंद्राच्या राष्ट्रीय हातमाग विकास कार्यक्रम अंतर्गत नमूद २०२२-२३ ते २०२५-२६ रोजीचे मार्गदर्शक तत्वे.

**प्रस्तावना :**

राज्यामधील हातमाग विणकरांनी उत्पादीत केलेल्या मालाला बाजारपेठ मिळावी या दृष्टीने दिनांक २१.९.२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये जाहिरात व प्रसिध्दी योजनेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

सदर शासन निर्णयानुसार राज्यात केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत मंजूर करण्यात येणाऱ्या विविध प्रदर्शनाकरीता तसेच राज्याबाहेर आयोजित होणाऱ्या राष्ट्रीय हातमाग प्रदर्शनीमध्ये भाग घेण्यासाठी राज्य हिश्श्याच्या अर्थसहाय्य देण्यात येते. तथापि, सन २०११ नंतर प्रदर्शनीमध्ये देण्यात येणाऱ्या अर्थसहाय्यामध्ये कोणताही बदल करण्यात आलेला नाही. सदर प्रदर्शनीकरीता देण्यात येणाऱ्या अर्थसहाय्यामध्ये वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यात केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत मंजूर करण्यात येणाऱ्या विविध प्रदर्शनाकरीता तसेच राज्याबाहेर आयोजित होणाऱ्या राष्ट्रीय हातमाग प्रदर्शनीमध्ये भाग घेण्यासाठी तसेच राज्यस्तरीय हातमाग प्रदर्शनी,जिल्हास्तरीय हातमाग प्रदर्शनी,विशेष हातमाग प्रदर्शनी आयोजित करण्यासाठी राज्याकडून देण्यात येणाऱ्या अर्थसहाय्याचे आकृतीबंध आणि अंमलबजावणी अटी व शर्ती खालीलप्रमाणे निश्चित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

अ) राज्याकडून देण्यात येणाऱ्या अर्थसहाय्याचा आकृतीबंध:-

| अ.क्र. | हातमाग प्रदर्शनीचा प्रकार | मंजूर करावयाचे अर्थसंहाय्य (लाखात) |
|---|---|---|
| १ | राष्ट्रीय हातमाग प्रदर्शनी | रूपये ४५.००/- |
| २ | राज्यस्तरीय हातमाग प्रदर्शनी | रूपये ३०.००/- |
| ३ | जिल्हास्तरीय हातमाग प्रदर्शनी | रूपये ०६.००/- |
| ४ | विशेष हातमाग प्रदर्शनी | रूपये १५.००/- |

ब) योजना अमंलबजावणीच्या अटी व शर्ती:-

सदर योजनेस केंद्राच्या राष्ट्रीय हातमाग विकास कार्यक्रम अंतर्गत नमूद सन २०२२-२३ ते २०२५-२६ रोजीच्या सुधारीत मार्गदर्शक तत्वे लागू राहतील.

२. सदर अर्थसहाय्याची रक्कम आयुक्त (वस्त्रोद्योग) यांनी आहरीत करून महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ,नागपूर व महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ यांना दरवर्षी ३१ ऑगस्टपूर्वी वितरीत करावी.

३. इतर राज्यामध्ये आयोजित राष्ट्रीय प्रदर्शनीमध्ये भाग घेण्यासाठी देण्यात आलेले अर्थसहाय्य महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ,नागपूर व महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ,मुंबई यांनी प्रत्यक्ष अदा केलेल्या स्टॉल भाडे व वाहतूक खर्चाकरीता रू.१२.०० लक्ष मर्यादेत राहील.

४. अ.क्र.३ येथील खर्चाचा तपशील महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ,नागपूर व महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ यांनी वित्तीय वर्ष समाप्तीनंतर १५ एप्रिल पूर्वी आयुक्त (वस्त्रोद्योग) यांना सादर करावा.

५. सदर योजनेवर होणारा खर्च "मागणी क्रमांक व्ही-२,२८५१-ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०,संमीश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) (५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सुट व इतर अर्थसहाय्य (कार्यक्रम) (२८५१ ०११९) २६,जाहिरात व प्रसिध्दी" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि त्या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५१२१६१९५४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANJUM BANO RASHIDKHAN PATHAN

Digitally signed by ANJUM BANO RASHIDKHAN PATHAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATIVE MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=c6a8800841f0173430c13770d9d86bc16cf387b050d3c5c9ebcedbbd3dcf07f3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D0F333CC391EF2D7D49DC6FD87E92EB9303FC9A19FD00938A0D8AE79AD2EB1F7, cn=ANJUM BANO RASHIDKHAN PATHAN
Date: 2024.03.15 12:25:32 +05'30'

**( अंजुम पठाण )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अ.मु.स. मंत्रालय, मुंबई ३२,
३. मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (गृह,विधी व न्याय) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४. मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
५. मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
६. मा.विरोधी पक्षनेता,विधान परिषद/ विधान सभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ३२
८. सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०. महालेखापाल ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१४. वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
१५. नियोजन विभाग (कार्यासन -१४३१), मंत्रालय, मुंबई.
१६. प्रादेशिक उपआयुक्त (वस्त्रोद्योग), मुंबई/नागपूर/छत्रपती संभाजीनगर/सोलापूर.
१७. निवड नस्ती ( टेक्स-३)